**विभागाच्या अधिपत्याखालील संस्थांना यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

**शासन निर्णय, क्रमांक : यंत्रख-२०२२/प्र.क्र.१९०/प्रशा-१,**

गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,

९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.

दिनांक : ०५ मे, २०२५.

**वाचा :**
१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,शासन निर्णय क्र.यंत्रख-२०२२/प्र.क्र.१९०/ प्रशा-१, दिनांक ०८.०७.२०२२
२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.: संवैशिवस/म /डॉशंचशावैमवरुना/सुप्रमा/२८६४/२०२५, दिनांक : ०९.०४.२०२५.
३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/म/सुधारीत प्रशासकीय मान्यता/३१३५/२०२५, दिनांक २८.०४.२०२५

**प्रस्तावना :**

विभागाच्या अधिपत्याखालील डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नांदेड व स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अंबाजोगाई या संस्थांना आवश्यक यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयाद्वारे राज्य योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून अनुक्रमे रुपये २,६६,००,०००/- व रुपये १,१९,७०,०००/- अशा एकूण रुपये ३,८५,००,०००/- (रूपये तीन कोटी, पंच्याऐंशी लक्ष फक्त) इतक्या रक्कमेची यंत्रसामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

सदर प्रशासकीय मान्यतेनुसार खरेदी प्रक्रिया राबविण्याकरीता हाफकीन महामंडळास अनुक्रमे रुपये २,६६,००,०००/- व रुपये १,१९,७०,०००/- अशा एकूण रुपये ३,८५,००,०००/- इतका निधी वर्ग करण्यात आला होता. सदर हाफकीन महामंडळास वर्ग करण्यात आलेल्या निधीतून संस्थेस यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करुन देण्यात आलेले  नसल्याने सदर दोन्ही संस्थांनी प्रस्तावीत केलेल्या संदर्भ क्र.१ अन्वये प्रशासकीय मान्यतेमधील खालील तक्त्यात नमूद सध्या आवश्यक असलेली एकूण रुपये ३,८५,००,०००/- (रूपये तीन कोटी, पंच्याऐंशी लक्ष फक्त) इतक्या रक्कमेची यंत्रसामुग्री व साधसामुग्री खरदीस सुधारीत प्रशासकीय मान्यतेकरीता सादर केलेल्या प्रस्तावास सुधारीत मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. ०१ शासन निर्णयामधील खालील तक्त्यात नमूद दोन्ही संस्थांना आवश्यक असलेली यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीसाठी सर्व अटी व शर्ती संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०८.०७.२०२२ प्रमाणे राहतील. प्रस्तुत यंत्रसामुग्री/साधनसामुग्रीसाठी येणारा खर्च हाफकीन महामंडळाकडे वर्ग करण्यात आलेल्या निधीमधून भागविण्यात यावा. यासाठी वेगळ्याने निधी उपलब्ध करून देता येणार नाही.

| डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नांदेड | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | मूळ शासन निर्णय दिनांक ०८.०७.२०२२ मधील अ.क्र. | यंत्राचे नाव | नग संख्या | प्रति नग किंमत (सर्व करांसहीत) | एकूण किंमत (सर्व करांसहीत) |
| १ | परिशिष्ट-अ १७४ | Phacoemulsification Machine | १ | ३०,००,००० | ३०,००,००० |
| २ | परिशिष्ट-अ १९७ | Slip Lamp High End | १ | ५,००,००० | ५,००,००० |
| ३ | परिशिष्ट-ब ४ | Lap. Instruments Set-(High End) | १ | ५०,००,००० | ५०,००,००० |
| ४ | परिशिष्ट-अ ८९ | ENDOSCOPE (HIGH END) | ४ | २,००,००० | ८,००,००० |
| ५ | परिशिष्ट-ब ४ | C-ARM Image Intensifier (Low End) | १ | २०,००,००० | २०,००,००० |
| ६ | परिशिष्ट-ब ४ | Uretero - Renoscopic Lithotripsy with all Accessories (High End) | १ | १०,००,००० | १०,००,००० |
| ७ | परिशिष्ट-अ १३ | Anaesthesia Bolyes Machine | ३ | ३,००,००० | ९,००,००० |
| ८ | परिशिष्ट-अ १५० | MIDRANGE USG MACHINE | १ | ८०,००,००० | ८०,००,००० |
| ९ | परिशिष्ट-ब ४ | C-Arm Machine (low End) | १ | २०,००,००० | २०,००,००० |
| १० | परिशिष्ट-अ १५६ | Multipara Monitor 5 PARA | २ | २,००,००० | ४,००,००० |
| ११ | परिशिष्ट-अ ४४ | Bronchoscope (Medium End) | १ | ३०,००,००० | ३०,००,००० |
| एकूण (अ) | | | | | २,६६,००,००० |
| स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अंबाजोगाई | | | | | |
| १२ | परिशिष्ट-अ १ | 12 Channel Ecg Machine | २ | १,५०,००० | ३,००,००० |
| १३ | परिशिष्ट-अ १४ | Anaesthesia Work Station (High End) | १ | ३५,००,००० | ३५,००,००० |
| १४ | परिशिष्ट-अ २१ | Automated Blood Culture System | १ | १४,००,००० | १४,००,००० |
| १५ | परिशिष्ट-अ | Blood Collection | ४ | १,५५,००० | ६,२०,००० |

| अ. क्र. | मूळ शासन निर्णय दिनांक ०८.०७.२०२२ मधील अ.क्र. | यंत्राचे नाव | नग संख्या | प्रति नग किंमत (सर्व करांसहीत) | एकूण किंमत (सर्व करांसहीत) |
|---|---|---|---|---|---|
| | ३७ | Monitor | | | |
| १६ | परिशिष्ट-अ ६१ | CPAP | २ | ३,००,००० | ६,००,००० |
| १७ | परिशिष्ट-अ ८९ | Endoscope (High End) | ४ | २,००,००० | ८,००,००० |
| १८ | परिशिष्ट-अ ९५ | Fiber Optic Intubation Bronchoscope | १ | १८,००,००० | १८,००,००० |
| १९ | परिशिष्ट-अ ९५ | Headlight (ENT) (High End) | १ | ३,५०,००० | ३,५०,००० |
| २० | परिशिष्ट-अ २३७ | Video Bronchoscope | १ | २६,००,००० | २६,००,००० |
| एकूण (ब) | | | | | १,१९,७०,००० |
| एकूण (अ+ब) | | | | | ३,८५,००,००० |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता सदर संस्थेतील हाफकीन महामंडळास यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी वर्ग करण्यात आलेल्या निधीमधून करण्याच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे. यासाठी राज्य शासनाकडून वेगळ्याने निधी उपलब्ध होणार नाही.

२) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावेत. सदर दर हे बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने याबाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबतची खातरजमा आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

३) सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे (Technical specification) व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची असावीत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात आल्यानंतरच सदर बाबींची खरेदी प्रक्रिया राबविण्याची जबाबदारी आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांची राहील.

४) प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत/खरेदीची व्दिरुक्ती होणार नाही व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी खात्री करावी.

५) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेस हाफकिन महामंडळास वर्ग करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा. यासाठी राज्य शासनाकडून वेगळ्याने निधी उपलब्ध होणार नाही.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५०५१४३६१८७३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2025.05.05 16:46:28 +05'30'

( अनिल आहिरे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
२) महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३) महाव्यवस्थापक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स् कॉपोरेशन लि., मुंबई
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५) अधिष्ठाता, डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नांदेड
६) अधिष्ठाता, स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अंबाजोगाई
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड/बीड
८) निवडनस्ती (प्रशा-१)